**सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद या संस्थेच्या प्रवेश परीक्षेकरिता छांत्राकडून घेण्यात येणाऱ्या परिक्षा शुल्कात वाढ करणेबाबत (स्वीय प्रंपजी लेख्यातून).**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र.एसपीआय-२०१५/(प्र.क्र.०४/१५)/२८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २५.०३.२०१५.

**वाचा**

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक- एसपीआय/२००२/९१०/प्र.क.८४/२००२/२८, दि. ३१.०८.२००२.
२) संचालक, सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद यांचे पत्र क्र.००४३/एसपीआय-२/३९८, दिनांक १२.१२.२०१४.

**प्रस्तावना**

संदर्भाधीन दिनांक ३१.०८.२००२ च्या शासन निर्णयाद्वारे सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद या संस्थेत प्रवेश घेऊ इच्छिणाऱ्या प्रत्येक विद्यार्थ्यांकडून रुपये ५०/- इतके प्रवेश परीक्षा शुल्क आकारण्यास शासनाने मंजुरी दिलेली आहे. तथापि, प्रवेश परीक्षा आयोजित करण्यासाठी होणारा खर्च तसेच वाढती महागाई व इतर संलग्न बाबी याचा विचार करता सदर प्रवेश परीक्षा शुल्कात वाढ करण्याचा प्रस्ताव संचालक, सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद यांच्या संदर्भाधीन दिनांक १२.१२.२०१४ च्या पत्रान्वये शासनास प्राप्त झाला असल्याने तद्नुषंगाने प्रवेश परीक्षा शुल्कात वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. तद्नुसार शासनाने खालील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय**

सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद या संस्थेत प्रवेश घेऊ इच्छिणाऱ्या विद्यार्थ्यांकडून यापूर्वी घेण्यात येत असलेल्या रुपये ५०/-(रुपये पन्नास फक्त) च्या प्रवेश परीक्षा शुल्कामध्ये वाढ करुन ते रुपये ४५०/- (रुपये चारशे पन्नास फक्त) इतके आकारण्यात यावे.

२. या जमा होणाऱ्या प्रवेश परीक्षा शुल्कातून, प्रवेश परिक्षेसाठी होणारा कार्यालयीन खर्च भागविण्यात यावा. या प्रयोजनार्थ प्राप्त होणारे शुल्क वैयक्तिक खाते लेखाशीर्ष “के-ठेवी व आगाऊ रकमा, ८४४३ नागरी ठेवी, १९६ वैयक्तिक ठेवी (८४४३ ५०८३) यामध्ये जमा करुन हाताळण्यात यावे.

३. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक : अनौसं-२३२/१५/व्यय-४, दिनांक १९.०३.२०१५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१५०३२६१५३०२७९४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pradeep Darade

Digitally signed by Pradeep Darade
DN: CN = Pradeep Darade, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.03.26 15:42:16 +05'30'

**प्र.ल.दराडे**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक
२. मा.राज्यमंत्री (मा.सै.क.) यांचे स्वीय सहाय्यक
३. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
५. महालेखापाल (स्थानिक निकाय लेखा परीक्षा व लेखा) महाराष्ट्र, मुंबई-३२,
६. कमांडर, महाराष्ट्र-गुजरात एरिया मुख्यालय, कुलाबा, मुंबई ४०० ००५,
७. सर्व जिल्हाधिकारी,
८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
९. संचालक, सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद, (५ प्रती)
१०. संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे ४११ ००६,
११. सह संचालक, लेखा व कोषागार, संगणक कक्ष, ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मुंबई ३२,
१२. निवड नस्ती (२ प्रती),